**जालना मुख्यालयी माहे जानेवारी, २०१९ मध्ये राष्ट्रीय स्तरावरील पशु-पक्षी प्रदर्शन आयोजित करण्यास तसेच, या प्रित्यर्थ येणारा खर्च रु.५.५० कोटी यास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- संकिर्ण -२०१८/प्र.क्र. ९४/पदुम-४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- ०६ डिसेंबर, २०१८.

वाचा : १. सन २०१८ च्या हिवाळी अधिवेशनात विधानमंडळाने मान्य केलेला पूरवणी मागणी प्रस्ताव.
२. आयुक्त पशुसंवर्धन, पुणे यांचे कार्यालयीन पत्र क्र.विस्तार / प्र.क्र. १४५/११२८४ /२०१८, पसं-१३, पुणे-६७ दि. २८.११.२०१८.

**प्रस्तावना :-**

सन २०१८-१९ वर्षात माहे जानेवारी, २०१९ मध्ये जालना येथे राष्ट्रीय स्तरावरील पशु-पक्षी प्रदर्शन आयोजित करणे प्रस्तावित आहे. सदर प्रदर्शनासाठी राज्यातील तसेच, राज्याबाहेरील जातीवंत पशु-पक्षी तसेच, त्यांचे शास्त्रोक्त पध्दतीने संगोपन करण्यासाठी आवश्यक यंत्र व उपकरणे, औषधी तसेच, पशुसंवर्धनाशी निगडीत बाबींसाठीच्या उत्पादनांचे स्टॉल उभारणे, जातीवंत पशु-पक्षांमधून सर्वोत्कृष्ठ पशुधनाची निवड करुन पशुपालकांना सन्मानीत करणे प्रस्तावित आहे.

प्रदर्शनाच्या माध्यमातून देशी गोवंश संवर्धनाचे महत्व पटवून देवून, देशी गोवंशामध्ये अनुवंशिक सुधारणा घडवून आणणे, सुशिक्षित बेरोजगारांना पशुपालनाव्दारे स्वयंरोजगाराच्या संधी उपलब्ध करुन देणे व त्यायोगे ग्रामीण अर्थव्यवस्था बळकट करणे, दुध, मांस व अंडी उत्पादनास चालना देणे, जनावरांची उत्पादन क्षमता वाढवून उत्पादन खर्च कमी करणे, सेक्स सॉरटेड सीमेनचा वापर, वैरण उत्पादनास चालना देणे, मुरघास/ हायड्रोपोनीक्स / अझोला तंत्रज्ञान या सारख्या विषयांबाबत पशुपालकांना सदर प्रदर्शनात तंत्रज्ञांकडून मार्गदर्शन करण्यात येणार आहे, व त्यामुळे पशुपालकांचे उत्पन्न दुप्पट होण्यास मदत होणार आहे.

जालना मुख्यालयी माहे जानेवारी, २०१९ मध्ये राष्ट्रीय स्तरावरील पशु-पक्षी प्रदर्शन आयोजित करण्यास तसेच, येणा-या खर्चास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याअनुषंगाने खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय:-**

जालना मुख्यालयी माहे जानेवारी, २०१९ मध्ये राष्ट्रीय स्तरावरील पशु-पक्षी प्रदर्शन आयोजित करण्यास तसेच येणा-या खर्चास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

उपरोक्त प्रमाणे येणारा खर्च सन २०१८-१९ मध्ये खालील लेखाशिर्षाखाली पूरवणी मागणीव्दारे मान्यता प्रदान करण्यात आलेल्या निधीमधून भागविण्यात यावा.

**लेखाशिर्ष :-**

मागणी क्र. डी-४
२४०३- पशुसंवर्धन,
(०१)(०१) पशुसंवर्धन संचालनालय (अनिवार्य खर्च)
१३- कार्यालयीन खर्च, रु.४५० लक्ष
२६- जाहिरात व प्रसिध्दी, रु.५० लक्ष
संकेतांक क्र. २४०३००२४

मागणी क्र. डी-४
२४०३- पशुसंवर्धन,
(०१)(०२) विभागीय कार्यालये (अनिवार्य खर्च)
५०- इतर खर्च, रु. ५० लक्ष
संकेतांक क्र. २४०३००३३

सदर प्रदर्शन आयोजित करण्यासाठी उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाचा शासन निर्णय दि.०१.१२.२०१६ मधील तरतूदी विचारात घेऊन खर्च करण्याची जबाबदारी आयुक्त पशुसंवर्धन यांची राहील.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेताक २०१८१२०६१२५०३७९४०१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shri Ravindra Gurav

Digitally signed by Shri Ravindra Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And Adf Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0030b22364370f4d96ab251b7263219586c0069b661c3f9cd6fd67e55000ce92, cn=Shri Ravindra Gurav
Date: 2018.12.06 12:57:30 +05'30'

**( रविंद्र गुरव )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, औध, पुणे.
४. आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, वरळी, मुंबई.
५. आयुक्त, मत्स्यव्यवसाय विभाग, महाराष्ट्र राज्य, चर्नीरोड, मुंबई
६. जिल्हाधिकारी, जालना
७. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जालना.
८. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
९. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
१०. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला.
११. उपसचिव (दुग्धव्यवसाय विकास) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. उपसचिव (मत्स्यव्यवसाय विभाग) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. व्यवस्थापकीय संचालक, पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र मेंढी व शेळी विकास महामंडळ, गोखलेनगर, पुणे.
१४. प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन (औरंगाबाद)
१५. जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त (जालना)

१६. जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद, (जालना)
१७. जिल्हा कोषागार अधिकारी, जालना
१८. अवर सचिव, पदुम-३, कक्ष अधिकारी पदुम-१/१६, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९. निवड नस्ती (पदुम-४).